**औद्योगिक विवाद अधिनियम,१९४७ मध्ये प्रस्तावित केलेल्या सुधारणांचा अभ्यास करुन अहवाल तयार करण्याकामी समिती गठित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: औविअ -११२०१४ /प्र.क्र.१३१ /कामगार-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २४ जुलै २०१७

**प्रस्तावना-**

औद्योगिक विवाद अधिनियम,१९४७ हा मालक व कामगार यांच्यात सुसंवाद साधुन कामगारांच्या हिताचे संरक्षण करणे व औद्योगिक शांतता प्रस्थापित करणे,या उद्देशाने अंमलात आणला आहे.नुकतेच मा.पंतप्रधान महोदयांनी देशातील औद्योगिकीकरणामध्ये वाढ व्हावी या उद्देशाने "मेक इन इंडीया " चे धोरण जाहिर केले असुन त्यानुषंगाने उदयोगासंदर्भातील विद्यमान कायदे व नियम सुलभ व्हावेत या करीता पावले उचलली आहेत.सदयाच्या जागतिकीकरणाच्या व उदारमतवादी युगात तीव्र झालेल्या स्पर्धात्मक युगात विविध उदयोगांना आकर्षित करुन मोठया प्रमाणात रोजगार निर्मितीस चालना देण्यासाठी तसेच कामगारांचे हित जोपासण्यासाठी औद्योगिक विवाद अधिनियम ,१९४७ च्या कलम २ ए,कलम २५ एफ (बी) ,कलम २५ के (१) व (१ए),कलम २५ एन (१) (बी),कलम २५ एन(९) व कलम २५ ओ(८) मध्ये सुधारणा करण्यासंदर्भातील प्रस्ताव मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक ३०/०५/२०१७ रोजीच्या बैठकीत मान्यतेस्तव ठेवण्यात आला होता.

सदर प्रस्तावावर सारासार चर्चा होवून उक्त अधिनियमात प्रस्तावित केलेल्या सुधारणांचा अभ्यास करुन अहवाल सादर करण्याकामी मा.मंत्री (कामगार), मा.मंत्री (महसूल),मा.मंत्री (उद्योग) यांची समिती गठित करण्याबाबत उक्त बैठकीत निर्णय घेण्यात आला होता.त्यास अनुसरुन अशी समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

मा.मंत्रीमंडळच्या दिनांक ३०/०५/२०१७ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार औद्योगिक विवाद अधिनियम,१९४७ च्या कलम २ए,कलम २५ एफ (बी) ,कलम २५ के (१)व(१ए),कलम २५ एन (१)(बी),कलम २५ एन(९) व कलम २५ ओ(८) मध्ये प्रस्तावित केलेल्या सुधारणांसंदर्भात अभ्यास करुन निर्णय घेण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| मा.मंत्री (कामगार) | अध्यक्ष |
| मा.मंत्री (महसुल) | सदस्य |
| मा.मंत्री (उद्योग) | सदस्य |
| प्रधान सचिव (कामगार) | सदस्य |
| कामगार आयुक्त,महाराष्ट्र राज्य,मुंबई | सदस्य सचिव |

सदर समितीस उक्त अधिनियमात प्रस्तावित केलेल्या अधिनियमात सुधारणांबाबत अभ्यास करुन त्यावर अंतिम निर्णय घेण्याचे पुर्ण प्राधिकार असतील .तसेच सदर समितीने उक्त प्रकरणी घेतलेल्या निर्णयाबाबतचा अहवाल समितीमार्फत मा.मुख्यमंत्री महोदयांना सादर करण्यात येईल.

सदर समितीच्या वेळोवेळी होणा-या बैठकांची व्यवस्था करणे ,बैठकीतील चर्चेचा तपशिल अहवाल तयार करण्याकामी संकलित करणे व अंतिम अहवाल तयार करणे इ.साठी सहाय्यभूत होईल अशी सर्व कार्यवाही करण्याची जबाबदारी सदस्य सचिव या नात्याने कामगार आयुक्त,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांची राहिल.

सदरहु समितीची कार्यकक्षा औद्योगिक विवाद अधिनियम,१९४७ मधील प्रस्तावित सुधारणांनुषगाने अभ्यास करुन निर्णय घेण्यापुरती मर्यादित राहिल. वरील समितीने आपला अहवाल ३ महिन्यात शासनास सादर करावा.

प्रस्तुत शासन निर्णय दिनांक ३०/०५/२०१७ रोजी मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७२४१६२०३९१०१० असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Kumar

Digitally signed by Rajesh Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1e08bc9f719f8ce54a66aed8ed2a521ee2d571facec17b204b286a31e88c58d9, cn=Rajesh Kumar
Date: 2017.07.26 13:12:38 +05'30'

**(राजेश कुमार )**
प्रधान सचिव (कामगार)

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
२. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
३. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
४. मा.मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
५. मा.राज्यमंत्री (कामगार) खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
६. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक
७. कामगार आयुक्त,महाराष्ट्र राज्य मुंबई
८. उपसचिव (कामगार) ,उद्योग ,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
९. निवड नस्ती (कामगार-२)